स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-II च्या अंमलबजावणी, तांत्रिक मार्गदर्शनासाठी "राज्यस्तरीय तांत्रिक समिती" गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक :-स्वभामि २०२१/प्र. क्र.६३/पापु १६
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८/११/२०२१.

वाचा :-

१. स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा- II, बाबत केंद्र शासनाच्या माहे जुलै, २०२० च्या मार्गदर्शक सूचना.
२. शासन परिपत्रक क्रमांक :-स्वभामि २०२०/प्र. क्र. १९०/पापु-१६, दिनांक ०२/११/२०२०.
३. शासन परिपत्रक क्रमांक :-स्वभामि २०२०/प्र. क्र. ११६ /पापु-१६, दिनांक २८/१०/२०२० व दिनांक १४/०१/२०२१.

प्रस्तावना

स्वच्छ भारत अभियान (ग्रा) टप्पा-II मध्ये, वैयक्तिक/सार्वजनिक स्तरीय शौचालय, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन, मासिक पाळी व्यवस्थापन, प्लास्टिक कचरा व्यवस्थापन, गोबरधन व मैला गाळ व्यवस्थापन, हि कामे गावस्तर, तालुकास्तर व जिल्हास्तरावर, सन २०२०-२१ ते सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात हाती घेण्याचे नियोजन आहे. संदर्भाधीन क्रमांक १ येथील स्वच्छ भारत अभियान (ग्रा) टप्पा-II च्या अनुषंगाने जुलै, २०२० मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक पुस्तिकेतील मुद्दा क्र ४.२.९ व मुद्दा क्र. ११.१ नुसार राज्य स्तरावर तांत्रिक सहाय्य यंत्रणा निवडण्याची राज्यास मुभा देण्यात आली आहे. उपरोक्त उपांगाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सर्व समावेशक सूचना संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. वरील सर्व उपांगाची अंमलबजावणी करताना, **योग्य तांत्रिक पर्यायांना मान्यता देणे,** विविध यंत्रणांचे तथा तंत्रज्ञानांचे empanelment करण्यासाठी मान्यता देणे, ग्रामीण क्षेत्रास अनुरूप भौगोलिक परिस्थिती नुसार अंमलबजावणी करताना येणा-या अडचणीवर उपाययोजना संदर्भात सविस्तर चर्चा करून, योग्य तांत्रिक पर्यायाच्या प्रस्तावांना मान्यता देणे, लोकसंख्या आधारित Business Model, किमान खर्चाची देखभाल व दुरूस्ती ( O&M ) व्यवस्था प्रस्थापित करणे कामी, आवश्यक प्रस्तावांना मान्यता प्रदान करणे, याकरिता **"राज्यस्तरीय तांत्रिक समिती"**

गठीत करणे आवश्यक असल्याने, **"राज्यस्तरीय तांत्रिक समिती"** गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

प्रस्तावनेत नमूद केलेल्या उपांगाच्या अमंलबजावणी करिता, खालील प्रमाणे **"राज्य स्तरीय तांत्रिक समिती"** गठीत करण्यात येत आहे.

२. **"राज्य स्तरीय तांत्रिक समिती"** ची रचना खालीलप्रमाणे असेल:-

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | सह सचिव (स्वभामि), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | युनिसेफ, या संस्थेचे तांत्रिक प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | ऑल इंडिया इन्स्टीटयुट ऑफ लोकल सेल्फ गर्व्हमेन्ट या संस्थेचे तांत्रिक प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग (कोकण) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे | सदस्य |
| ६. | अधिक्षक अभियंता, म.नि. व सं.सं.कक्ष, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई. | सदस्य |
| ७. | राज्य अभियान संचालक, स्वभामि (नागरी), नगर विकास विभाग, मित्तल टॉवर मुंबई. | सदस्य |
| ८. | संचालक - मित्रा, नाशिक | सदस्य |
| ९. | निरी, नागपुर या संस्थेचे तांत्रिक प्रतिनिधी | सदस्य |
| १०. | पर्यावरण नियोजन प्राद्योगिकी केंद्र ( CEPT ), अहमदाबाद या संस्थेचे तांत्रिक प्रतिनिधी | सदस्य |
| ११. | प्रकल्प संचालक, (स्वभामि) राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई | सदस्य सचिव |

३. **समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-**

अ) राज्य स्तरावर स्वच्छ भारत अभियान (ग्रा) टप्पा-॥ कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी भौगोलिक परिस्थितीनुरूप योग्य तांत्रिक पर्याय निश्चिती व निवडीबाबत मार्गदर्शन करणे. तसेच त्याअनुषंगाने तांत्रिक सहाय्य यंत्रणा निश्चितीस मार्गदर्शन करणे.

ब) राज्य स्तरावर विविध संस्थाकडून empanelment साठी प्राप्त होणाऱ्या तंत्रज्ञानाचा अभ्यास करुन अस्तित्वात असलेली लोकसंख्या भौगोलिक व आर्थिक परिस्थिती विचारात घेवून,

सदर तंत्रज्ञान वापरणे उचित होईल किंवा कसे, याबाबत निर्णय घेणे तथा त्यासंदर्भातील नियोजन प्रक्रिया सूचविणे.

क) इतर राज्यामध्ये उपलब्ध असलेल्या तंत्रज्ञानाचा किफायतशीरपणा तसेच अंमबवजावणीसाठी लागू करावयाची शक्यता विचारात घेवून, त्यासंदर्भातील नियोजन प्रक्रिया सूचविणे.

ड) स्वच्छतेसंदर्भात राज्यामध्ये वा इतरत्र लागू करण्यात आलेल्या अद्ययावत तंत्रज्ञानाचे माहिती व शिक्षण संवाद माध्यमातून प्रसिद्धी देण्यासाठी व सर्व स्तरावरील घटकांना प्रशिक्षणे देण्यासाठी सुलभ व किफायतशीर व्यवस्था लागू करणेसाठी प्रक्रिया सूचविणे.

इ) राज्यस्तरावर तथा जिल्हा स्तरावर नियुक्त करण्यात आलेल्या किंवा नियुक्त करावयाच्या व्यावसायिक संस्थांना वेळोवेळी आलेल्या अंमलबजावणी संदर्भातील अडचणीसंदर्भात उपाय सूचविणे.

ई) सदर समितीची बैठक आवश्यकतेनुसार वेळोवेळी घेण्यात यावी.

उ) आवश्यकतेनुसार समितीचा अभ्यास दौरा तसेच, क्षेत्रिय भेटी निश्चित कराव्यात. त्याअनुषंगाने क्षेत्रिय स्तरावर अंमलबजावणी करिता अनुकुल असलेले तंत्रज्ञान लागू करण्यासाठी सूचविणे.

ए) या समितीचा कालावधी हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३१/०३/२०२५ पर्यंत राहील. या समितीच्या संरचनेमध्ये फेरबदल करण्याचे अधिकार समिती अध्यक्ष यांना राहतील.

४. वरील परिच्छेद- ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे **राज्यस्तरीय तांत्रिक समिती** बैठक, अभ्यास दौरा, क्षेत्रिय भेटी करिता येणारा खर्च, स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-II करिता असलेल्या लेखाशिर्षाखालील ADMINISTRATIVE CHARGES या घटकाखाली तसेच स्वच्छतेसंदर्भात राज्यामध्ये वा इतरत्र लागू करण्यात आलेल्या अद्ययावत तंत्रज्ञानाचे माहिती व शिक्षण संवाद माध्यमातून प्रसिद्धी देण्यासाठी येणारा खर्च, माहिती, शिक्षण व संवाद (Information Education & Communication) या घटकाखाली मंजूर असलेल्या निधीमधून करावा. (संदर्भाधीन क्रमांक १ येथील मार्गदर्शक सूचनां मधील परिच्छेद क्रमांक १५.२)

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२१११७१५२०५९०४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

CHANDRAKANT KRISHNA MORE

Digitally signed by CHANDRAKANT KRISHNA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, pseudonym=268C7E15F99BF8B492638E14751A661EBCF0233F, serialNumber=2314CF333E070F9936792BC95890FA89B2F617A931B2B577B703FA858F3DF433, cn=CHANDRAKANT KRISHNA MORE
Date: 2021.11.18 11:58:48 +05'30'

**(चं. कृ. मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. सर्व मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. जिल्हा परिषद अध्यक्षा/अध्यक्ष ,सर्व.
९. सर्व विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११. प्रकल्प संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व.
१३. उपायुक्त (विकास), सर्व.
१४. संचालक, मीत्रा -नाशिक /संचालक, नीरी-नागपूर/ संचालक, उन्नत महाराष्ट्र अभियान, सर्व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय
१५. उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( पाणी व स्वच्छता/पंचायत), जिल्हा परिषद सर्व, यांनी ह्या शासन निर्णयाच्या छायाप्रती प्रत्येक सभापती /उपसभापती, पंचायत समिती व गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांना द्याव्यात व गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांनी प्रत्येक पंचायत समिती सदस्य, सरपंच व ग्राम विकास अधिकारी यांना द्याव्यात.
१६. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग सर्व
१७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
१८. संगणक समन्वयक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी सदरचा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर व राज्य

शासनाच्या संकेतस्थळावर अपलोड करावा तसेच वरील सर्वांना ई-मेल द्वारेही पाठवावा.

१९.निवडनस्ती,पापु-१६.